**कोषागारातून रोख देय अनुदान**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.....
(२२१५ ९७९१)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१४/प्र.क्र.५३/पा.पु.१०

जी.टी.हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: १९ नोव्हेंबर, २०१४

## शासन निर्णय -

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या नव्याने उघडण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली संबंधित जिल्हा परिषदांना सर्वसाधारण घटकांतर्गत ( Normal allocation) कव्हरेज व गुणवत्ताबाधित क्षेत्रासाठी पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

यासंदर्भात उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी रु.२०.०० कोटी (रुपये वीस कोटी मात्र) इतके अनुदान या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्र. ३ नुसार संबंधित जिल्हा परिषदांना मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

अटी :- १) संबंधित जिल्हा परिषदांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या कव्हरेज व गुणवत्ताबाधीत गावे/वाडयांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाडयांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे, अशा प्रगतीपथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करावयाचे आहे.

२) जिल्हा परिषदांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची जिल्हा परिषदांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषदा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना जिल्हा परिषदांनी विभागीय आयुक्त,

(विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे. राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम राज्यस्तरावरुन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागासाठी मंजूर केलेल्या निधीतून तसेच जिल्हा नियोजन मंडळ, TSP, OTSP व इतर राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय योजनांसाठी उपलब्ध होणाऱ्या निधीतून उपलब्ध करुन घेऊन खर्च करण्यात यावी.

५) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता, IMIS या प्रणालीवर घेण्यात येऊन सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

६) सदर निधी सन २०११-१२, २०१२-१३, २०१३-१४, व २०१४-१५ या वर्षांच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय ,०२ -लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०२)( (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम)केंद्र हिस्सा (यासाठी अनुदाने ,३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१४-१५ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

" **हा शासन निर्णय वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५४९/व्यय-३, दि. १७/१०/२०१४ अनुसार त्या विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे**."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. **२०१४१११९१६३८११२१२८** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.11.20 16:15:13 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, औरंगाबाद, नाशिक व अमरावती
मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषदा
मुख्य लेखा व वित्त अधिकारी संबंधित जिल्हा परिषदा
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, संबंधित जिल्हा परिषदा
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती कार्यासन पापु-१०

**विवरणपत्र**

| | | |
|---|---|---|
| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१४/प्र.क्र. ५३/ पापु-१०, दिनांक : १९ नोव्हेंबर, २०१४ चे सहपत्र | | |
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) **(लेखाशिर्ष २२१५ ९७९१)** | | |
| अ.क्र. | जिल्हा परिषद | वितरीत करण्यात येणारी रक्कम (रु. लाखात) |
| १ | २ | ३ |
| १ | औरंगाबाद | १००.०० |
| २ | भंडारा | १५०.०० |
| ३ | सातारा | ५०.०० |
| ४ | उस्मानाबाद | १५०.०० |
| ५ | नाशिक | १५०.०० |
| ६ | लातूर | १००.०० |
| ७ | सिंधुदूर्ग | १००.०० |
| ८ | चंद्रपूर | १००.०० |
| ९ | गडचिरोली | ३००.०० |
| १० | गोंदिया | १००.०० |
| ११ | हिंगोली | १००.०० |
| १२ | नागपूर | १००.०० |
| १३ | परभणी | १५०.०० |
| १४ | सांगली | १००.०० |
| १५ | वर्धा | १५०.०० |
| १६ | यवतमाळ | १००.०० |
| | **एकूण** | **२०००.०० ( रुपये दोन हजार लक्ष मात्र )** |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.11.20 16:16:46 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन